टाकळी -कलान बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता. भातकुली जि. अमरावती, या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्रमांकः लपात २२१६/(२५४/१६)/२०१६ लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १२/०४/२०१७

पहावे-

१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचा निर्णय क्र.विपाविम/कातां.४/३१/ टाकळी कलान/ प्र.मा. (६२/०८)दि.३०.१.२००९.

प्रस्तावना-

टाकळी -कलान बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता. भातकुली जि. अमरावती, या योजनेस महामंडळ निर्णय क्र.विपाविम/कातां.४/३१/टाकळी कलान/ प्र.मा. (६२/०८)दि.३०.१.२००९ (दरसूची २००८-२००९) अन्वये एकूण रु. १८२१.२८८लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. त्यानंतरच्या कालावधीत योजनेच्या खर्चात दरसूचीतील वाढ, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, जास्त दराची निविदा स्वीकृती, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ झाल्याने योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे. सदर प्रकल्प हा अमरावती जिल्ह्यातील अनुशेष निर्मुलनासाठी निश्चित केलेल्या प्रकल्पांच्या यादीत समाविष्ट आहे.

टाकळी कलान बृहत लपा, जि. अमरावती या प्रकल्पाच्या सुधारीत प्रशासकिय मान्यतेचा अहवाल राज्य तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांच्या मार्फत छाननी होऊन अपर मुख्य सचिव (वित्त), अपर मुख्य सचिव (नियोजन) आणि प्रधान सचिव (जसं) यांच्या सचिव स्तरावरील त्रिसदस्यीय उपसमितीसमोर दि. २६.०४.२०१६ रोजी ठेवण्यात आला होता. समितीने सदर प्रस्ताव मा. मंत्रीमंडळासमोर मान्यतेसाठी ठेवण्यात यावा, अशी शिफारस केली होती. त्यानुसार नियामक मंडळाच्या दि. १८.५.२०१६ च्या ६३ व्या बैठकीत सदर सुप्रमा प्रस्ताव ठेवण्यात आला होता. नियामक मंडळाने प्रकल्पाच्या सुधारीत प्रशासकिय मान्यतेचा प्रस्ताव मा. मंत्रीमंडळासमोर मान्यतेसाठी सादर करण्यास मान्यता दिली. सदर प्रस्ताव मा. मंत्रीमंडळासमोर ठेवण्याकरीता आवश्यक शेरेपूर्ततेसह दि.०३.०३.२०१७ रोजी शासनास कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचेकडून प्राप्त झाला आहे. त्यानुसार दि. ३०मार्च,२०१७ रोजी झालेल्या मंत्रीमंडळाच्या बैठकीत सदर प्रकल्पाचा सुप्रमा प्रस्ताव विचारार्थ ठेवण्यात आला होता. त्यास मंत्रीमंडळाने मान्यता देण्याचा निर्णय घेतला. त्याअनुषंगाने खालील प्रमाणे निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

शासन निर्णय-

आता या निर्णयान्वये टाकळी -कलान बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता. भातकुली जि. अमरावती या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ११७१०.४५ लक्ष (रु. एकशे सतरा कोटी, दहा लक्ष, पंचेचाळीस हजार,फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामासाठी एकूण रूपये ११९४२.०५ लक्ष (रू. एकशे अकरा कोटी,बेचाळीस लक्ष, पाच हजार फक्त) व अनुषंगीक खर्च

रूपये ५६८.४० लक्ष (रू. पाच कोटी,अडुसष्ट लाख,चाळीस हजार फक्त) आहेत. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २०१३-१४ या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. प्रकल्प पुर्ण केल्यावर अमरावती जिल्ह्यातील १२५० हे. रब्बी समतुल्य इतका अनुशेष निर्मुलन होण्यास मदत होणार आहे. उपशिर्षवार तरतुदींचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशिर्ष, - "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (००)/(०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (लपा) (४७०२ ५१०१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता ( १५७ /२०१७) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय दि.३०/०३/२०१७ च्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१२१२२७१५९०२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत :** परिशिष्ट "अ"

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2017.04.12 12:29:18 +05'30'

( रा.बा. क्षीरसागर )
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
३. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
४. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
५. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
   मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
६. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, अमरावती.
८. अधीक्षक अभियंता, ऊर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती.
९. कार्यकारी अभियंता, अमरावती पाटबंधारे विभाग, अमरावती.

१०.अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.लपा-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
१३.लपा-२, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : लपात २२१६/(२५४/१६)/२०१६ लपा-२, दि.१२.०४.२०१७ चे परिशिष्ट**
**टाकळी-कलान बृहत लघु पाटबंधारे प्रकल्प ता.भातकुली जि.अमरावती प्रथम सुधारीत प्रशासकिय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अक्र | तपशील | मूळ प्र.मा.नुसार किंमत रु.लक्ष | प्रथम सु.प्र.मा. नुसार किंमत रु.लक्ष |
|---|---|---|---|
| १ | अ-प्राथमिक | १२.२० | ३९.५७ |
| २ | ब-जमिन | ३९४.०२ | ५४५८.०१ |
| ३ | क-कामे | ८२५.९५ | ३४४८.३५ |
| ४ | डि-विमोचक | ६६.७९ | १६८.३८ |
| ५ | ई-प्रपात | ०.०० | ०.०० |
| ६ | एफ-आर एच टी कामे | ७.७० | १८२.४७ |
| ७ | एच -निर्गमन | १०.०० | ४.५८ |
| ८ | जी- पुल | ३.८५ | १२२.२८ |
| ९ | के - इमारती | ०.०० | ०.०० |
| १० | एल-मातिकाम | ८५.०० | २१६.३४ |
| ११ | एम-वृक्षारोपण | २.५०२ | ९.३७ |
| १२ | ओ-संकिर्ण | ३९.९७१ | ३९.९७१ |
| १३ | पी - देखभाल | ९.३१२ | ९.३१२ |
| १४ | आर- दळणवळण | २६.२५३ | २५.६२ |
| १५ | एक्स -एनव्हायरमेंट | १०.०० | १० |
| १६ | -वितरीका व वाटर कोर्सेस | १९८.०० | १४०८.७३ |
| | **एकूण** | **१६९१.५३६** | **११९४२.०५** |
| | अनुषंगीक खर्च | १२९.७५२ | ५६८.४० |
| | **एकूण** | **१८२१.२८८** | **११७१०.४५** |

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र ८९३ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा ५३०२ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. २,२०,९००/ स.घ.मी.

ड) लाभव्यय गुणोत्तर १.०५ > १